**गृह विभागाच्या विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्पासाठी गठित केलेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीला बळकट करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१५/प्र.क्र.६४/विशा-३अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २२ मार्च, २०१७

<u>वाचा</u> :- १. शासन निर्णय समक्रमांक दिनांक १८ जून २०१५
२. शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०२ जून २०१६
३. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण २०१६ /प्र.क्र.२१/विशा ३ अ, दिनांक ०४ जून २०१६

<u>प्रस्तावना</u> :-

वरील संदर्भात उद्दहत शासन निर्णय क्रमांक संकिर्ण २०१६ /प्र.क्र.२१/विशा ३ अ, दिनांक ०४ जून २०१६ गृह विभागातील विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प या योजनेस संदर्भ ३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यात सायबर सुरक्षा प्रकल्प तसेच भविष्यात तंत्रज्ञानावर आधारित गुन्हे अन्वेषणासंबंधी अनेक प्रकल्प राबवायचे असल्यास अशा प्रकल्पांना ह्या प्रकल्पाचा भाग म्हणून राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने संदर्भ २ मध्ये गृह विभागातील सायबर प्रकल्पासाठी उच्चस्तरिय शक्ती प्रदत्त समिती स्थापन करण्यात आली होती.

वरील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या कार्यकक्षेत विविध तंत्रज्ञान आधारीत प्रकल्प (उदा.CCTNS, AMBIS इत्यादी) समाविष्ट असल्याची बाब अधिक स्पष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

संदर्भ २ येथे नमूद अमुस गृह यांच्या अध्यक्षतेखाली गठित उच्चस्तरिय शक्ती प्रदत्त समिती च्या कार्यकक्षेत गृह विभागातील सध्या अस्तित्वात असलेले व भविष्यात वेळोवेळी घेण्यात येणारे तंत्रज्ञान आधारीत प्रकल्प समाविष्ठ करण्यात येत आहे.

२. मंत्रिमंडळाच्या निर्णयानुसार गृह विभागातील सर्व तंत्रज्ञान विषयक प्रकल्पांचा आराखडा व अंमलबजावणी यात धोरणात्मक व प्रशासकीय एकसुत्रता ठेवण्याकरीता तसेच या प्रकल्पांची मान्यता व अंमलबजावणी करण्याकरिता एक समान निर्णय प्रक्रिया ठेवण्याकरीता संदर्भ २ च्या शासन निर्णयानुसार कार्यन्वित करण्यात आलेली उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या कार्याकक्षामध्ये गृह विभागातील सर्व तंत्रज्ञान विषयक प्रकल्प समावेश करण्यात येत आहे.

समितीची रचना व इतर बाबी पूर्वीप्रमाणेच कायम ठेवण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३२२१६०३४२६२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suresh M. Khade

Digitally signed by Suresh M. Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4b9c3bfe0cf5832f9fb73e937c85fff475ad0238a20da77ce26bb6669f386614, cn=Suresh M. Khade
Date: 2017.03.22 16:04:57 +05'30'

( सुरेश खाडे )
उपसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
५. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध) मुंबई
८. उप सचिव (अर्थसंकल्प), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अवर सचिव (अर्थसंकल्प), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.अपर मुख्य सचिव, गृह विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१२.अधिदान व लेखा अधिकारी / निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१३.वित्त विभाग, व्यय-७/ विनियम, मंत्रालय, मुंबई
१४.निवडनस्ती/गृह विभाग (विशा-३ अ).